केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण व राज्य पुरस्कृत विविध आवास योजनांना गतिमान करणे व गुणवत्ता वाढीसाठी राज्यात "**महा आवास अभियान - ग्रामीण**" राबविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो-२०२०/प्र.क्र.१०७/योजना-१०**
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: १९ नोव्हेंबर, २०२०

**वाचा :-**

१) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : पीएमएवाय-जी-२०१६/प्र.क्र. ३३३/योजना-१०, दिनांक १४ ऑक्टोबर, २०१६.
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-२०११/प्र.क्र. १२६/मावक-२, दिनांक १९ नोव्हेंबर, २०११.
३) आदिवासी विकास विभाग, शासन शासन निर्णय क्रमांक : घरकुल-२०१२/प्र.क्र. ३८(भाग-१)/का-१७, दिनांक २८ मार्च, २०१३.
४) आदिवासी विकास विभाग, शासन शासन निर्णय क्रमांक : घरकुल-२०१६/प्र.क्र. ३७/का-१७, दिनांक २७ मे, २०१६.
५) आदिवासी विकास विभाग, शासन शासन निर्णय क्रमांक : आदिम-२०१५/प्र.क्र. ८९/का-१९, दिनांक ३१ मार्च, २०१६.
६) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : गृनियो-२०१७/प्र.क्र. ६०/विजाभज-१, दिनांक २४ जानेवारी, २०१८.
७) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : इबांका २०१८/प्र.क्र. २०८/कामगार-७, दिनांक १४ जानेवारी, २०१९.
८) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रआयो-२०१७/प्र.क्र. ६०/योजना-१०, दिनांक १४ जुलै, २०१७.
९) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : प्रआयो-२०१७/प्र.क्र. ३४८/योजना-१०, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१८.

**प्रस्तावना:-**

"सर्वांसाठी घरे-२०२२" हे केंद्र शासनाचे महत्वाचे धोरण असून राज्य शासनाने देखील या धोरणाचा स्विकार केला आहे. या अनुषंगाने राज्यात राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयाच्या माध्यमातून केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण तसेच राज्य पुरस्कृत रमाई

आवास योजना, शबरी आवास योजना, पारधी आवास योजना, आदिम आवास योजना, अटल बांधकाम कामगार आवास योजना, यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना अशा विविध ग्रामीण गृहनिर्माण योजना राबविण्यात येत असून त्यांना पूरक पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजना, अतिक्रमण नियमानुकूल करण्याची योजना अशा योजनाही राबविण्यात येत आहेत. सन २०२०-२१ या वर्षाकरिता प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत एकूण ४,०५,०७७ घरकुलांचे उद्दिष्ट प्राप्त झाले आहे.

संयुक्त राष्ट्रांच्या शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) मधील ध्येय क्रमांक ११ नुसार किफायतशीर गृहनिर्माण (Affordable Housing) क्षेत्राचा विकास झाल्यास एकूण १७ SDG पैकी किमान १४ SDG वर सकारात्मक प्रभाव पडणार आहे. यासाठी घरकुलांच्या कामाची प्रगती फक्त संख्यात्मक न राहता गुणात्मक राहवी, नावीन्यपूर्ण कल्पना अंमलात आणून लाभार्थ्यांना सर्व सुविधायुक्त असे घरकुल उपलब्ध करुन द्यावे, तसेच नैसर्गिक आपत्तीस सक्षमपणे सामोरे जाणारे घरकुल बांधण्यासाठी सर्वांनी पुढाकार घ्यावा असे शासनाचे ध्येय आहे.

प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण ही योजना देशात दिनांक २० नोंव्हेंबर, २०१६ पासून अंमलात आली असून दरवर्षी २० नोव्हेंबर हा "राष्ट्रीय आवास दिन" म्हणून राबविण्यात येतो. या वर्षी प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत आवास दिनाचे औचित्य साधून राज्यात सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजना अधिक गतिमान करण्यासाठी व गुणवत्तावाढीसाठी “महा आवास अभियान-ग्रामीण” राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

सन २०२०-२१ या वर्षामध्ये महाराष्ट्र राज्यात दिनांक २० नोव्हेंबर, २०२० रोजीच्या राष्ट्रीय आवास दिनाचे औचित्य साधून दिनांक २० नोव्हेंबर २०२० ते २८ फेब्रुवारी २०२१ या १०० दिवसांच्या कालावधीत “महा आवास अभियान-ग्रामीण” राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. “सर्वांसाठी घरे-२०२२” या शासनाच्या धोरणांतर्गत अभियान कालावधीत विविध उपक्रम राबवून केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण व राज्य पुरस्कृत रमाई आवास योजना, शबरी आवास योजना, पारधी आवास योजना, आदिम आवास योजना, अटल बांधकाम कामगार आवास योजना, यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना या सर्व ग्रामीण गृहनिर्माण योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या कामास गतिमान करणे व गुणवत्ता आणणे हे या अभियानाचे उद्दिष्ट आहे.

२. **“महा आवास अभियान-ग्रामीण” राबविण्याचे उद्देश:-**

i. राज्यात ग्रामीण गृहनिर्माण योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या कामास गतिमान करणे.

ii. ग्रामीण गृहनिर्माण योजनांमध्ये शासकीय यंत्रणेबरोबरच समाजातील सर्व घटक जसे- पंचायत राज संस्था, स्वयंसेवी संस्था, सहकारी संस्था, खासगी संस्था (Corporates), तंत्र शिक्षण संस्था, बँका, लोकप्रतिनिधी, लाभार्थी, ग्रामस्थ, इ. चा सक्रीय सहभाग वाढविणे.

iii. ग्रामीण गृहनिर्माण क्षेत्रामध्ये नावीन्यपूर्ण उपक्रम राबवून घरांचा दर्जा व गुणवत्ता वाढविणे.

iv. ग्रामीण गृहनिर्माण योजनांमधील लाभार्थ्यांसाठी शासनाच्या विविध योजनांचा कृतिसंगम (Convergence) घडवून आणणे.

v. राज्यात ग्रामीण गृहनिर्माण क्षेत्रातील भागधारकांची क्षमताबांधणी व जन-जागृतीद्वारे लोक चळवळ उभी करणे.

३. **"महा आवास अभियान- ग्रामीण" कालावधीत राबवावयाचे उपक्रम :-**

i. **भूमीहीन लाभार्थ्यांना जागा उपलब्ध करुन देणे** (Land to Landless Beneficiaries):- ग्रामीण गृहनिर्माण योजनांतर्गत गरजू, पात्र परंतु घरकुल बांधकामासाठी जागा उपलब्ध नसलेल्या लाभार्थ्यांना,

अ) पंडीत दीनदयाळ उपाध्याय घरकुल जागा खरेदी अर्थसहाय्य योजना.

ब) शासकीय जागा विनामूल्य उपलब्ध करण्याची योजना.

क) ग्रामीण भागातील अतिक्रमणे नियमानुकूल करण्याची योजना.

ii. **घरकुलांच्या उद्दिष्टांप्रमाणे १०० टक्के मंजूरी देणे** (Closing Gap Between Target and Sanction) :- राज्यस्तरावरुन केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२०-२१ पर्यंत जिल्ह्यांना वितरीत करण्यात आलेल्या उद्दिष्टांना १०० टक्के मंजूरी देणे.

iii. **मंजूर घरकुलांना पहिल्या हप्त्याचे १०० टक्के वितरण करणे** (Closing Gap Between Sanction and 1st Instalment) :- केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२०-२१ मधील मंजूर घरकुलांना पहिल्या हप्त्याचे १०० टक्के वितरण विनाविलंब करणे.

iv. **घरकुलांच्या उद्दिष्टानुसार १०० टक्के घरकुले भौतिकदृष्ट्या पूर्ण** (Closing Gap Between Target & Completion) **करणे:-** केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२०-२१ मधील उद्दिष्टानुसार १०० टक्के घरकुलांचे काम भौतिकदृष्ट्या पूर्ण करणे.

v. **प्रलंबित घरकुले** (Delayed Houses) **पूर्ण करणे:-** प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत घरकुलांना पहिला हप्ता प्रदान केल्यापासून १२ महिन्यापेक्षा जास्त कालावधी झालेल्या, मात्र

अद्यापपर्यंत अपूर्ण असलेली प्रलंबित घरकुले (Delayed Houses) प्राधान्याने पूर्ण करणे व यापुढे अशा यादीमध्ये घरकुलांचा समावेश होणार नाही याची दक्षता घेणे.

vi. **सर्व घरकुले आर्थिकदृष्ट्या पूर्ण करणे (Financial completion):-** केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत योजनांमधील सन २०१६-१७ ते २०२०-२१ मधील सर्व घरकुलांना भौतिक प्रगतीनुसार सर्व हप्ते प्रदान करून सर्व घरकुले आर्थिकदृष्ट्या पूर्ण करणे.

vii. **ग्रामीण गवंडी प्रशिक्षण (Rural Mason Training) पूर्ण करणे:-** घरकुलांची गुणवत्ता सुधारण्यासाठी प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत ग्रामीण गवंडी प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत दिलेले उद्दिष्ट प्रशिक्षण देणाऱ्या संस्थांशी (Training provider) समन्वय ठेवून पूर्ण करुन कुशल गवंडी तयार करणे.

viii. **डेमो हाऊसेस (Demo House) उभारणे :-** घरकुलांची गुणवत्ता सुधारण्यासाठी व लाभार्थ्यांना मार्गदर्शक ठरण्यासाठी प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत जिल्ह्यास दिलेल्या उद्दिष्टाप्रमाणे पंचायत समिती निहाय सर्व डेमो हाऊसेस (Demo Houses) पूर्ण करणे.

ix. **कायमस्वरुपी प्रतिक्षा यादीतील लाभार्थ्यांचे आधार सिडींग व आवास प्लस मधील लाभार्थ्यांचे आधार सिडींग/ जॉब कार्ड मॅपिंग १०० टक्के पूर्ण करणे (Aadhar Seeding of PWL & Awaas Plus /Job Card Mapping):-**प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत कायम स्वरुपी प्रतिक्षा यादी (-ब॰ यादी) मधील लाभार्थ्यांचे आधार सिडींग व आवास प्लस (-ड॰ यादी) मधील लाभार्थ्यांचे आधार सिडींग/ जॉब कार्ड मॅपिंग १०० टक्के पूर्ण करणे.

x. **शासकीय योजनांशी कृतीसंगम (Convergence) व नावीन्यपूर्ण उपक्रमांची (Innovative/ Best Practices) अंमलबजावणी करणे :-**

I. **शासकीय योजनांशी कृतीसंगम करुन लाभार्थ्यांना-**

अ) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने मधून रोजगार व स्वच्छ भारत मिशन-ग्रामीण मधून शौचालय देणे.

ब) जल जीवन मिशन मधून नळाने पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करणे.

क) प्रधानमंत्री उज्ज्वला योजने मधून गॅस जोडणी देणे.

ड) सौभाग्य योजने मधून विद्युत जोडणी देणे.

इ) राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियाना मधून उपजिविकेचे साधन देणे.

II. **नावीन्यपूर्ण उपक्रम-**

अ) पुरेशी जागा नसल्यास बहुमजली इमारती (जी+ २) बांधणे.

ब) पुरेशी जागा असल्यास गृहसंकुल उभारुन त्यांची सहकारी संस्था स्थापने.

क) लाभार्थ्यांना घरकुल बांधकामासाठी बँकेचे रु. ७०,०००/- कर्ज स्वरुपात मिळवून देणे.

ड) घरकुलांचे बांधकाम साहित्य जसे- दगड, विटा, वाळू, सिमेंट, स्टिल, छताचे साहित्य इ. उपलब्ध करण्यासाठी -घरकुल मार्ट सुरु करुन त्यात महिला बचत गटांचा सहभाग घेणे.

इ) पंचायत राज संस्था (जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्रामपंचायत), स्वयंसेवी संस्था, सहकारी संस्था, कॉरपोरेट संस्था, लाभार्थी व लोक सहभाग यांच्या माध्यमातून मूलभूत सुविधा देवून -आदर्श घरांची निर्मिती करणे.

४. **"महा आवास अभियान-ग्रामीण" अंमलबजावणीसाठी क्षमताबांधणी कार्यक्रम :**

१) **"महा आवास अभियान-ग्रामीण" राज्यस्तरीय शुभारंभ कार्यशाळा** :- अभियानाचा शुभारंभ "राष्ट्रीय आवास दिन" दिनांक २० नोव्हेंबर, २०२० रोजी मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या शुभहस्ते, मा.उपमुख्यमंत्री, मा.मंत्री (ग्रामविकास), मा.मंत्री (महसूल, आदिवासी विकास, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य), मा. राज्यमंत्री (ग्राम विकास व महसूल), मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज विभाग), अतिरिक्त मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव (महसूल विभाग, आदिवासी विकास विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग), आयुक्त, (आदिवासी विकास, समाज कल्याण, कामगार), संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण यांचे उपस्थितीत राज्यस्तरीय कार्यशाळेचे आयोजनाने होईल.

या कार्यशाळेत सर्व विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद), प्रकल्प संचालक (जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा), राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी, बँक प्रतिनिधी, मिडीया प्रतिनिधी, इत्यादींना अभियानाबाबत मार्गदर्शन करण्यात येईल. ही कार्यशाळा फिजीकल डिस्टन्सींग पाळून आणि/अथवा व्हिडीओ कॉन्फरन्सींगच्या माध्यमातून आयोजित करण्यात यावी.

- **विभागस्तरीय कार्यशाळा** :- राज्यातील सर्व विभागांमध्ये दिनांक २१ नोव्हेंबर, २०२० ते २७ नोव्हेंबर, २०२० या कालावधीत संबंधित विभागीय आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली जिल्ह्यातील जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद), अतिरिक्त आयुक्त/ उपायुक्त (आदिवासी विकास, सामाजिक न्याय, कामगार) यांचे उपस्थितीत विभागस्तरीय कार्यशाळांचे आयोजन करण्यात यावे.

या कार्यशाळांत प्रकल्प संचालक (जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा), प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प), सहाय्यक आयुक्त (समाज कल्याण), उप जिल्हा कार्यकारी अधिकारी (महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ), जिल्हा माहिती अधिकारी, गट विकास अधिकारी, विभागीय कार्यालयातील संबंधित अधिकारी/कर्मचारी, बँक प्रतिनिधी, मिडीया प्रतिनिधी, इ. यांना अभियानाबाबत मार्गदर्शन करण्यात येईल. सदर कार्यशाळेस राज्यस्तरावरुन राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कार्यालयाचे अधिकारी निरीक्षक म्हणून उपस्थित राहतील. या कार्यशाळा फिजीकल डिस्टन्सींग पाळून आणि/अथवा व्हिडीओ कॉन्फरन्सींग च्या माध्यमातून आयोजित करण्यात याव्यात.

- **जिल्हास्तरीय कार्यशाळा** :- राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये दिनांक २८ नोव्हेंबर, २०२० ते ०४ डिसेंबर, २०२० या कालावधीत मा.पालकमंत्री यांचे अध्यक्षतेखाली तसेच मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद यांचे प्रमुख उपस्थितीत आणि मा. खासदार, मा. आमदार, जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद), प्रकल्प संचालक (जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा), प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प), सहाय्यक आयुक्त (समाज कल्याण), उप जिल्हा कार्यकारी अधिकारी (महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ) यांच्या उपस्थितीत जिल्हास्तरीय कार्यशाळांचे आयोजन करण्यात यावे.

  या कार्यशाळांत जिल्ह्यातील सर्व पंचायत समिती सभापती, उपसभापती, गट विकास अधिकारी, तहसिलदार, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा कार्यालयातील संबंधित अधिकारी/कर्मचारी, तालुकास्तरीय डाटा एन्ट्री ऑपरेटर, बँक प्रतिनिधी, मिडीया प्रतिनिधी, इ. यांना अभियानाबाबत मार्गदर्शन करण्यात येईल. सदर कार्यशाळेस विभागस्तरावरील अधिकारी हे निरीक्षक म्हणून उपस्थित राहतील. या कार्यशाळा फिजीकल डिस्टन्सींग पाळून आणि/अथवा व्हिडीओ कॉन्फरन्सींगच्या माध्यमातून आयोजित करण्यात याव्यात.

- **तालुकास्तरीय कार्यशाळा** :- राज्यातील जिल्ह्यातील सर्व तालुक्यांमध्ये दिनांक ०५ डिसेंबर, २०२० ते ११ डिसेंबर, २०२० या कालावधीत तालुक्याचे मा. आमदार यांचे अध्यक्षतेखाली तसेच पंचायत समिती सभापती, उपसभापती, जिल्हा परीषद सदस्य, पंचायत समिती सदस्य, गट विकास अधिकारी, तहसिलदार यांच्या उपस्थितीत तालुकास्तरीय कार्यशाळांचे आयोजन करण्यात यावे.

या कार्यशाळांत तालुक्यातील सर्व सरपंच, ग्रामसेवक, तलाठी, पंचायत समिती कार्यालयातील संबंधित अधिकारी/कर्मचारी, स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, ग्रामीण गृहनिर्माण अभियंता, बँक प्रतिनिधी, मिडीया प्रतिनिधी, इत्यादींना अभियानाबाबत मार्गदर्शन करण्यात येईल. सदर कार्यशाळेस जिल्हास्तरावरील संपर्क अधिकारी हे निरीक्षक म्हणून उपस्थित राहतील. या कार्यशाळा फिजीकल डिस्टन्सींग पाळून आणि/अथवा व्हिडीओ कॉन्फरन्सींग च्या माध्यमातून आयोजित करण्यात याव्यात.

- **ग्रामस्तरीय कार्यशाळा** :- राज्यात सर्वत्र दिनांक १२ डिसेंबर, २०२० ते १८ डिसेंबर, २०२० या कालावधीत गावस्तरावर सरपंच यांच्या अध्यक्षतेखाली ग्रामपंचायत सदस्य व इतर मान्यवरांच्या उपस्थितीत **ग्रामस्तरीय कार्यशाळा** आयोजित करुन त्यामध्ये ग्रामसेवक, तलाठी हे अभियानाबाबत सखोल मार्गदर्शन करतील.

  या कार्यशाळाद्वारे “महा आवास अभियान-ग्रामीण” चे यशस्वी अंमलबजावणीसाठी मिळालेली माहिती सर्व लाभार्थी यांना देवून गावातील गतिमान अंमलबजावणीबाबतचे नियोजन करण्यात येईल. सदर कार्यशाळेस तालुकास्तरावरील संपर्क अधिकारी हे निरीक्षक म्हणून उपस्थित राहतील. या कार्यशाळा फिजीकल डिस्टन्सींग पाळून आणि/अथवा व्हिडीओ कॉन्फरन्सींग च्या माध्यमातून आयोजित करण्यात याव्यात.

- **ग्राम कृती गटाचे (Village Action Group) गठन** :- या ग्रामस्तरीय कार्यशाळेमध्ये प्रत्येक ग्रामपंचायती मध्ये "ग्राम कृती गटाचे गठन" करण्यात यावे. यामध्ये गावातील प्रभावी व्यक्ती, युवक/युवती, इत्यादींचा समावेश करता येईल. या गटाने “महा आवास अभियान-ग्रामीण” मध्ये गावस्तरावर केल्या जाणाऱ्या व करावयाच्या प्रत्यक्ष उपाय योजनांचा फिजीकल डिस्टन्सींग पाळून आणि/अथवा व्हिडीओ कॉन्फरन्सींगच्या माध्यमातून पाठपुरावा करुन अभियान १०० टक्के यशस्वी करावयाचे आहे.

- **लाभार्थी मेळावे** :- गावोगावी फिजीकल डिस्टन्सींग पाळून आणि/अथवा व्हिडीओ कॉन्फरन्सींगच्या माध्यमातून लाभार्थ्यांचे मेळावे आयोजित करुन अभियानाच्या उद्दिष्टांबाबत, घरकुल बांधकाम व दर्जाबाबत मार्गदर्शन व प्रोत्साहन देवून अभियान यशस्वी करण्यासाठी प्रयत्न करावयाचे आहेत.

- **बँक मेळावे** :- तालुकास्तरावर/ गावोगावी फिजीकल डिस्टन्सींग पाळून आणि/अथवा व्हिडीओ कॉन्फरन्सींग च्या माध्यमातून बँक अधिकाऱ्यांच्या उपस्थितीत घरासाठी कर्ज घेवू इच्छिणाऱ्या लाभार्थ्यांसाठी बँक मेळाव्याचे आयोजन करुन लाभार्थ्यांना घरकुल बांधण्यासाठी कर्ज उपलब्धतेसाठी प्रयत्न करावयाचे आहेत.

५. **"महा आवास अभियान- ग्रामीण" चा प्रचार व प्रसिध्दीसाठी माहिती शिक्षण व संवाद (IEC) कार्यक्रम** :-

"महा आवास अभियान- ग्रामीण" अंतर्गत राज्यात राबविण्यात येणाऱ्या विविध घरकुल योजनांबाबत जन जागृती, प्रचार-प्रसिध्दी करण्यासाठी माहिती, शिक्षण व संवाद (IEC) च्या विविध उपक्रमांचा जसे- Mass मिडीया, Outdoor मिडीया, Social मिडीया, Group मिडीया, आंतरव्यक्ती संवाद (IPC), पारंपारीक मिडीया, इ. उपक्रमांचा यथोचीत वापर करण्यात यावा.

६. **अभियानाची प्रभावी अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन :-**

"महा आवास अभियान-ग्रामीण" च्या प्रभावी अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापनासाठी राज्य, विभाग, जिल्हा, तालुका व गाव स्तरावर पुढीलप्रमाणे समित्या कार्यरत राहतील.

- **राज्यस्तरीय अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | | पदनाम |
|---|---|---|---|
| १ | अतिरिक्त मुख्य सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग | : | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त मुख्य सचिव, वित्त विभाग | : | सदस्य |
| ३ | अतिरिक्त मुख्य सचिव, महसूल व वन विभाग | : | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | : | सदस्य |
| ५ | सचिव, आदिवासी विकास विभाग | : | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव, इतर मागास बहूजन कल्याण विभाग | : | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | : | सदस्य |
| ८ | संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण | : | सदस्य सचिव |

- **विभागस्तरीय अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | | पदनाम |
|---|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय | : | अध्यक्ष |
| २ | अपर आयुक्त, आदिवासी विकास | : | सदस्य |
| ३ | अपर कामगार आयुक्त/ कामगार उपायुक्त | : | सदस्य |
| ४ | विभागीय उप आयुक्त, समाज कल्याण | : | सदस्य |
| ५ | उपआयुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय | : | सदस्य |
| ६ | उपआयुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त कार्यालय | : | सदस्य |
| ७ | बँक क्षेत्रीय अधिकारी | : | सदस्य |
| ८ | उपआयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय | : | सदस्य सचिव |

- **जिल्हास्तरीय अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | | पदनाम |
|---|---|---|---|
| १ | कार्यकारी अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | : | अध्यक्ष |
| २ | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | : | सदस्य |
| ३ | सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण | : | सदस्य |
| ४ | उपजिल्हा कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ | : | सदस्य |
| ५ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत), जिल्हा परिषद | : | सदस्य |
| ६ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) | : | सदस्य |
| ७ | निवासी उप जिल्हाधिकारी | : | सदस्य |
| ८ | जिल्हा पुरवठा अधिकारी | : | सदस्य |
| ९ | जिल्हा माहिती अधिकारी | : | सदस्य |
| १० | लीड बँकर्स / बँक प्रतिनिधी | : | सदस्य |
| ११ | प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | : | सदस्य सचिव |

- **तालुकास्तरीय अंमलबजावणी, सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | | पदनाम |
|---|---|---|---|
| १ | गट विकास अधिकारी, पंचायत समिती | : | अध्यक्ष |
| २ | तहसिलदार | : | सदस्य |
| ३ | उप अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद | : | सदस्य |
| ४ | उप अभियंता (पाणी पुरवठा), जिल्हा परिषद | : | सदस्य |
| ५ | विस्तार अधिकारी, पंचायत | : | सदस्य |
| ६ | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक/ ग्रामीण गृहनिर्माण अभियंता | : | सदस्य |
| ७ | राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान चे प्रतिनिधी | : | सदस्य |
| ८ | बँक प्रतिनिधी | : | सदस्य |
| ९ | विस्तार अधिकारी, संबंधित | : | सदस्य सचिव |

- **ग्रामपंचायतस्तरीय अंमलबजावणी ,सनियंत्रण व मूल्यमापन समिती :-**

| अ.क्र. | पद | | पदनाम |
|---|---|---|---|
| १ | सरपंच,ग्रामपंचायत | : | अध्यक्ष |
| २ | उप सरपंच, ग्रामपंचायत | : | सदस्य |
| ३ | ग्राम रोजगार सेवक, मनरेगा | : | सदस्य |
| ४ | तलाठी | : | सदस्य |
| ५ | महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी चे प्रतिनिधी | : | सदस्य |
| ६ | राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान चे प्रतिनिधी | : | सदस्य |
| ७ | ग्राम विकास अधिकारी /ग्रामसेवक, ग्रामपंचायत | : | सदस्य सचिव |

वरील अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समित्या राज्यस्तर, विभागस्तर, जिल्हास्तर, तालुकास्तर व गावपातळीवरुन क्षमता बांधणी कार्यशाळा, आढावा बैठका, क्षेत्रिय भेटी (Field Visits), Awaas Soft, MIS Formats, इ. द्वारे अभियानाचे संनियंत्रन व मूल्यमापन करतील.

७. **"महा आवास अभियान-ग्रामीण" कालावधीत राबविण्यात आलेल्या उपक्रमांचे मूल्यमापन** :-

२० नोव्हेंबर २०२० ते २८ फेब्रुवारी २०२१ हा अभियान कालावधी संपल्यावर अभियानात राबविण्यात आलेल्या उपक्रमांचे मूल्यमापन करण्यात येईल. या मूल्यमापनाच्या आधारे राज्य, विभाग, जिल्हा, तालुका,

ग्रामस्तरावर उत्कृष्ट कामासाठीच्या पुरस्कारांची नामांकने काढण्यात येतील. परिच्छेद ८ मध्ये नमूद विविध स्तरावरील उत्कृष्ट कामासाठीच्या पुरस्काराची नामांकने खालीलप्रमाणे समित्याव्दारे निवडण्यात येतील.

| पुरस्कार नामांकने | उत्कृष्ट कामासाठीच्या पुरस्कारांची नामांकने निवडण्यासाठी समित्या |
|---|---|
| राज्यस्तरीय पुरस्कारांची निवड | राज्यस्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |
| विभागस्तरीय पुरस्कारांची निवड | विभागस्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |
| जिल्हास्तरीय पुरस्कारांची निवड | जिल्हास्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |
| तालुकास्तरीय पुरस्कारांची निवड | तालुकास्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |
| ग्रामपंचायतस्तरीय पुरस्कारांची निवड | तालुकास्तरीय अंमलबजावणी, संनियंत्रण व मूल्यमापन समिती |

मूल्यमापनाचे निकष सोबत "परिशिष्ट-अ व परिशिष्ट-ब" मध्ये देण्यात आले आहेत.

८. **“महा आवास अभियान- ग्रामीण” कालावधीतील उत्कृष्ट कार्याचा गौरव :-** मूल्यमापनातून समोर आलेल्या अभियानात उत्कृष्ट काम करणारे विभाग, जिल्हे, तालुके, क्लस्टर्स, ग्रामपंचायती, लाभार्थी यांच्या कामाचा प्रशस्तीपत्र व मानचिन्ह देऊन पुढील प्रमाणे पुरस्कार देवून गौरव करण्यात येईल.

❖ **राज्यस्तरीय पुरस्कार :-**

- **प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

✓ सर्वोत्कृष्ट विभाग- प्रथम क्रमांक.

✓ सर्वोत्कृष्ट जिल्हे - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

✓ सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

✓ सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

✓ सर्वोत्कृष्ट बहुमजली इमारत व सर्वोत्कृष्ट गृहसंकुल- प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

- **राज्य पुरस्कृत आवास योजना**

✓ सर्वोत्कृष्ट विभाग- प्रथम क्रमांक.

- ✓ सर्वोत्कृष्ट जिल्हे - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ सर्वोत्कृष्ट बहुमजली इमारत व सर्वोत्कृष्ट गृहसंकुल- प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

❖ **विभागस्तरीय पुरस्कार:-**

- **प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

- ✓ सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ ग्रामीण गृहनिर्माण योजनेकरिता लाभार्थ्यांना घरकुल बांधण्यासाठी कर्ज देणारी सर्वोत्कृष्ट बँक शाखा - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ शासकीय जागा उपलब्धता व वाळू उपलब्धता सर्वोत्कृष्ट कामगिरी - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

- **राज्य पुरस्कृत आवास योजना**

- ✓ सर्वोत्कृष्ट तालुके - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ ग्रामीण गृहनिर्माण योजनेकरिता लाभार्थ्यांना घरकुल बांधण्यासाठी कर्ज देणारी सर्वोत्कृष्ट बँक शाखा - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ शासकीय जागा उपलब्धता व वाळू उपलब्धता सर्वोत्कुष्ट कामगिरी - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

❖ **जिल्हास्तरीय पुरस्कार:-**

- **प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

- ✓ सर्वोत्कृष्ट क्लस्टर - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
- ✓ सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

✓ ग्रामीण गृहनिर्माण योजनेकरिता लाभार्थ्यांना घरकुल बांधण्यासाठी कर्ज देणारी सर्वोत्कृष्ट बँक शाखा - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

- **राज्य पुरस्कृत आवास योजना**

✓ सर्वोत्कृष्ट क्लस्टर - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
✓ सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
✓ ग्रामीण गृहनिर्माण योजनेकरिता लाभार्थ्यांना घरकुल बांधण्यासाठी कर्ज देणारी सर्वोत्कृष्ट बँक शाखा - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

❖ **तालुकास्तरीय पुरस्कार :-**

- **प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

✓ सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
✓ सर्वोत्कृष्ट घरकुल - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

- **राज्य पुरस्कृत आवास योजना**

✓ सर्वोत्कृष्ट ग्रामपंचायत - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.
✓ सर्वोत्कृष्ट घरकुल - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

❖ **ग्रामपंचायतस्तरीय पुरस्कार :-**

- **प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण**

✓ सर्वोत्कृष्ट घरकुल - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

- **राज्य पुरस्कृत आवास योजना**

✓ सर्वोत्कृष्ट घरकुल - प्रथम, व्दितीय व तृतीय क्रमांक.

"महा आवास अभियांन-ग्रामीण" यामध्ये उत्कृष्ट कार्याचा गौरव/ पुरस्कार वितरण कार्याक्रमाबाबत स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

९. आपत्कालीन व्यवस्थापन, मदत व पुर्नवसन या विभागाचे “कोवीड-१९ च्या व्यवस्थापनाबाबत राष्ट्रीय मार्गदर्शक सूचना” या मथळ्याखाली नमूद सर्व सूचना तसेच सार्वजनिक आरोग्य विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील सर्व सूचनांचे काटेकोर पालन करावे.

१०. “महा आवास अभियान-ग्रामीण” अंमलबजावणीसाठीचा खर्च प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण व राज्य पुरस्कृत योजना यांच्या प्रशासकीय निधीतून करण्यात यावा.

११. सदर "महा आवास अभियान-ग्रामीण" च्या अंमलबजावणी बाबतच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण कार्यालय स्वतंत्रपणे निर्गमित करील.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११९१५०१४०२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Sudhakar Pathak

Digitally signed by Hemant Sudhakar Pathak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a58924bb1ebc2ed6699e048bfa42ad41d1ed32de1e3eda84d0c03040473905e, cn=Hemant Sudhakar Pathak
Date: 2020.11.19 17:18:04 +05'30'

**(हे.सु.पाठक)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. सभापती, विधान परिषद यांचे खासगी सचिव.
३. मा. अध्यक्ष, विभानसभा यांचे खासगी सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे अतिरिक्त मुख्य सचिव व प्रधान सचिव.
५. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा/ विधान परिषद यांचे खासगी सचिव.
७. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खासगी सचिव.
८. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खासगी सचिव.
९. मा. सर्व पालकमंत्री तथ मंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव.

११. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, नियोजन/ वित्त/ सामाजिक न्याय/ आदिवासी विकास/ गृहनिर्माण विभाग.
१२. संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. आदिवासी विकास आयुक्त, नाशिक.
१४. समाज कल्याण आयुक्त, पुणे.
१५. कामगार आयुक्त, मुंबई.
१६. सर्व विभागीय आयुक्त.
१७. सर्व जिल्हाधिकारी.
१८. सर्व कार्यकारी अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१९. सर्व उपायुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय.
२०. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय.
२१. सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती.
२२. सर्व सरपंच, ग्रामपंचायत.
२३. निवड नस्ती (कार्यासन-योजना-१०).

## परिशिष्ट अ

### राज्य, विभाग, जिल्हा, तालुकास्तरीय पुरस्कार निवडीसाठीचे निकष

| अ. क्र. | राबविलेले उपक्रम | पारितोषिकासाठी निवडीचे निकष | कमाल गुण | गुणांकन पध्दती (टक्केवारीच्या प्रमाणात गुण देण्यात येतील) |
|---|---|---|---|---|
| १. | भूमीहीन लाभार्थ्यांना जागा उपलब्ध करुन देणे. | केंद्र व राज्य पुरस्कृत घरकुल योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२०-२१ या कालावधीमधील पात्र व भूमीहीन लाभार्थ्यांना अभियान कालावधीमध्ये शासनाच्या विविध योजना वा इतर मार्गाने जागा उपलब्ध करुन देणे. | १० | एकूण पात्र व भूमीहीन लाभार्थ्यांपैकी किती लाभार्थ्यांना अभियान कालावधीमध्ये जागा उपलब्ध करुन दिली, त्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ७५% भूमीहीन लाभार्थ्यांना जागा उपलब्ध करुन दिल्यास ७.५ गुण) |
| २. | **घरकुलांच्या** उद्दिष्टांप्रमाणे १०० टक्के मंजूरी देणे. | केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२०-२१ या कालावधीमध्ये प्राप्त उद्दिष्टापैकी उर्वरित सर्व घरकुलांस अभियान कालावधीमध्ये १०० टक्के मंजूरी देणे. | १० | उद्दिष्टापैकी अभियान कालावधीमध्ये मंजूरी दिलेल्या घरकुलांच्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ८०% घरकुलांना मंजूरी दिल्यास ८ गुण) |
| ३. | मंजूर घरकुलांना पहिल्या हप्त्याचे १०० टक्के वितरण करणे. | केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२०-२१ या कालावधीमध्ये मंजूरी दिलेल्या सर्व घरकुलांना अभियान कालावधीमध्ये पहिला हप्ता विनाविलंब वितरीत करणे. | १० | मंजूर घरकुलांपैकी अभियान कालावधीमध्ये पहिला हप्ता दिलेल्या घरकुलांच्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ७५% घरकुलांना पहिला हप्ता वितरीत केल्यास ७.५ गुण) |
| ४. | **घरकुलांच्या** उद्दिष्टानुसार १०० टक्के घरकुले भौतिकदृष्ट्या पूर्ण करणे. | केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांतर्गत सन २०१६-१७ ते २०२०-२१ या कालावधीमधील उद्दिष्टानुसार अभियान कालावधीमध्ये १०० टक्के घरकुले भौतिकदृष्ट्या पूर्ण करणे. | २० | उद्दिष्टांपैकी अभियान कालावधीमध्ये भौतिकदृष्ट्या पूर्ण झालेल्या घरकुलांच्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ८०% घरकुले पूर्ण झाल्यास १६ गुण) |
| ५. | **घरकुलांच्या** | केंद्र पुरस्कृत योजना व राज्य पुरस्कृत | १० | भौतिक प्रगतीनुसार पूर्ण |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | उद्दिष्टानुसार १०० टक्के घरकुले आर्थिकदृष्ट्या पूर्ण करणे. | योजनांमधील सन २०१६-१७ ते २०२०-२१ मधील सर्व घरकुलांना भौतिक प्रगतीनुसार अभियान कालावधीत सर्व हप्ते प्रदान करून सर्व घरकुले आर्थिकदृष्ट्या पूर्ण करणे. | | घरकुलांचे अभियान कालावधीत सर्व हप्ते वितरीत केल्यास आर्थिकदृष्ट्या पूर्ण घरकुलांच्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा.५०% भौतिकदृष्ट्या पूर्ण घरकुलांचे हप्ते वितरीत केल्यास ५ गुण) |
| ६. | ग्रामीण गवंडी प्रशिक्षण पूर्ण करणे. | प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत ग्रामीण गवंडी प्रशिक्षणाचे १०० टक्के उद्दिष्ट प्रशिक्षण देणाऱ्या संस्थांशी (Training Provider) समन्वय साधून पूर्ण करणे. | १० | उद्दिष्टापैकी जेवढे ग्रामीण गवंडी प्रशिक्षीत होतील त्या प्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ७५% ग्रामीण गवंडी प्रशिक्षण पूर्ण झाल्यास ७.५ गुण) |
| ७. | डेमो हाऊसेस उभारणे. | प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत दिलेल्या उद्दिष्टानुसार डेमो हाऊस (Demo House) पंचायत समिती निहाय पूर्ण करणे. | १० | डेमो हाऊसेसच्या उद्दिष्टापैकी किती डेमो हाऊसेस पूर्ण झाली त्याप्रमाणात गुण देण्यात येतील. (उदा. ८०% डेमो हाऊस बांधले असल्यास ८ गुण). |
| ८. | **कायमस्वरुपी प्रतिक्षा यादीतील लाभार्थ्यांचे आधार सिडींग व आवास प्लस मधील लाभार्थ्यांचे आधार सिडींग/ जॉब कार्ड मॅपिंग** १०० **टक्के पूर्ण करणे**. | प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत कायमस्वरुपी प्रतिक्षा यादीतील (-ब॰ यादी) आधार सिडींग व आवास प्लस (-ड॰ यादी) मधील लाभार्थ्यांचे आधार सिडींग/**जॉब कार्ड मॅपिंग** १०० **टक्के पूर्ण करणे**. | १० | कायमस्वरुपी प्रतिक्षा यादीमधील आधार सिडींग व आवास प्लस मधील एकूण लाभार्थ्यांपैकी आधार सिडींग/ जॉब कार्ड मॅपिंग पूर्ण करण्यात आलेल्या लाभार्थ्यांच्या प्रमाणात प्रत्येकी ५ या प्रमाणे १० पैकी गुण देण्यात येतील. (उदा. ७५% आधार सिडींग पूर्ण झाल्यास ७.५ गुण). |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ९. | शासकीय योजनांशी कृतीसंगम व नावीन्यपूर्ण उपक्रमांची अंमलबजावणी करणे. | **I) शासकीय योजनांशी कृतीसंगम करुन लाभार्थ्यांना-**<br>अ) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने मधून रोजगार व स्वच्छ भारत मिशन-ग्रामीण मधून शौचालय देणे.<br>ब) जल जीवन मिशन मधून नळाने पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करणे.<br>क) प्रधानमंत्री उज्ज्वला योजने मधून गॅस जोडणी देणे.<br>ड) सौभाग्य योजने मधून विद्युत जोडणी देणे.<br>इ) राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान मधून उपजिविकेचे साधन देणे.<br><br>**II) नावीन्यपूर्ण उपक्रम-**<br>अ) पुरेशी जागा नसल्यास बहुमजली इमारती (जी + २) बांधणे.<br>ब) पुरेशी जागा असल्यास गृहसंकुल उभारुन त्यांची सहकारी संस्था स्थापने.<br>क) लाभार्थ्यांना घरकुल बांधकामासाठी बँकेचे रु.७०,०००/- कर्ज स्वरुपात मिळवून देणे.<br>ड) घरकुलाचे बांधकाम साहित्य जसे- दगड, विटा, वाळू, सिमेंट, स्टिल, छताचे साहित्य इ. उपलब्ध करुन देण्यासाठी -घरकुल मार्ट सुरु करुन त्यात महिला बचत गटांचा सहभाग घेणे. | १० | नमूद शासकीय योजनांशी कृतीसंगम (Convergence) मधील ५ बाबींसाठी प्रत्येकी १ गुण व नमूद नाविन्यपूर्ण उपक्रम अंमलबजावणी मधील ५ बाबींसाठी प्रत्येकी १ गुण या प्रमाणे १० गुणांपैकी गुण देण्यात येतील. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | इ) पंचायत राज संस्था (जिल्हा परिषद, पंचायत समिती, ग्रामपंचायत), स्वयंसेवी संस्था, सहकारी संस्था, कॉर्पोरेट संस्था, लाभार्थी व लोक सहभाग यांच्या माध्यमातून मूलभूत सुविधा देवून आदर्श घरांची निर्मिती करणे. | | |
| | | **एकूण गुण** | **१००** | |
| १० | प्रलंबित घरकुले (Delayed House) पूर्ण करणे. | प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीण अंतर्गत प्रथम हप्ता वितरीत केल्यानंतर १२ महिन्यामध्ये घरकुल पूर्ण न केल्यामुळे प्रलंबित घरकुलांमध्ये (Delayed Houses) समाविष्ट झालेली घरकुले पूर्ण करणे. | १० | अभियान संपताना Performance Index मध्ये असलेले निगेटिव्ह गुण यास १० ने गुणून येणारे गुण एकूण गुणातून वजा करण्यात येतील. |

**टिप :-** उपरोक्त सर्व अ.क्र.१ ते १० हे निकष प्रधानमंत्री आवास योजना-ग्रामीणसाठी लागू राहतील व अ.क्र.१ ते ५ व ९ हे निकष राज्य पुरस्कृत आवास योजनांसाठी लागू राहतील.

**परिशिष्ट-ब**

**सर्वोत्कृष्ट घरकुल, सर्वोत्कृष्ट बहुमजली इमारत व सर्वोत्कृष्ट गृहसंकुल निवडीचे निकष**

| अ.क्र. | पारितोषिकासाठी निवडीचे निकष | कमाल गुण | गुणांकन पध्दती |
|---|---|---|---|
| १ | नियोजन आराखडा, प्लास्टर, लादी, किचन ओटा व रंगरंगोटी असलेले घरकुल. | २० | नियोजन आराखडा, प्लास्टर, लादी, किचन ओटा व रंगरंगोटी असल्यास प्रत्येकी ४ गुण देण्यात यावेत. |
| २ | किमान कालावधीत पूर्ण केलेले घरकुल. | २० | भौतिकदृष्ट्या व आर्थिकदृष्ट्या किमान कालावधीत म्हणजे ६० दिवसात घरकुल पूर्ण केल्यास २० गुण, ९० दिवसासाठी १८ गुण, १२० दिवसासाठी १६ गुण याप्रमाणे दर वाढीव महिन्याला २ गुण कमी करण्यात यावेत. |
| ३ | शासकीय योजनांशी कृतीसंगम असलेले घरकुल. | २० | शासन निर्णयातील अ.क्र.३ (X) मध्ये शासकीय योजनांशी कृतीसंगम मधील नमूद ५ मुदद्यांच्या आधारे प्रत्येकी ४ याप्रमाणे गुण देण्यात यावेत. |
| ४ | रेन वॉटर हार्वेस्टींग, किचन गार्डन/परसबाग, वृक्ष लागवड, सौरउर्जा वापर इ. सुविधा असलेले घरकुल. | २० | रेन वॉटर हार्वेस्टींग, किचन गार्डन/परसबाग, वृक्ष लागवड व सौरउर्जा वापर यास प्रत्येकी ५ याप्रमाणे गुण देण्यात यावेत. |
| ५ | मूलभूत सुविधा (अंतर्गत रस्ता, ड्रेनेज व्यवस्था, इ), घरावर योजनेचा लोगो, लाभार्थ्यांचे (पती-पत्नी) नाव, ग्रामपंचायत प्रॉपर्टी रजिस्टरमध्ये नोंद, इ. | २० | मूलभूत सुविधा (अंतर्गत रस्ता, ड्रेनेज व्यवस्था, इ), घरकुलावर योजनेचा लोगो, लाभार्थ्यांचे (पती-पत्नीचे) नाव, ग्रामपंचायत प्रॉपर्टी रजिस्टरमध्ये नोंद, यास प्रत्येकी ५ याप्रमाणे गुण देण्यात यावेत. |
| **एकूण गुण** | | १०० | |